**आदिवासी क्षेत्र उपयोजना/आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना जुलै,२०१० च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यांत आलेल्या विविध उपशिर्षांखालील योजनांतर्गत तरतुदीचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.१८८/का.६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- १४ सप्टेंबर, २०१०**

**वाचा :** शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पुरक-२०.१०/प्र.क्र.१४९ /अर्थसंकल्प-३, दिनांक ३० जुलै, २०१०

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२०) म्हणुन महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग- ४ दिनांक २७ जुलै, २०१० रोजी पुरवणी मागण्यांच्या अर्थसंकल्पीय तरतूदीच्या वितरणासाठी पारित झाला आहे. शासन आता या निर्णयाद्वारे सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-२ मध्ये दर्शविलेल्या योजनांच्या तरतूदी स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रक अधिकाऱ्यांकडे सुर्पूद करण्यास व खर्च करण्यास मंजूरी देत आहे. त्यांनी या तरतूदी कॅश फ्लो प्रमाणे खर्च करावयात.

२. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य कार्यक्रमांवर/योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी. सदर तरतूदी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

४. सर्व नियंत्रण अधिका-यांनी योजनावार मासिक खर्चाची विवरणे आदिवासी क्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी स्वतंत्रपणे विहीत प्रपत्रात ज्या महिन्यात खर्च झाला असेल त्याच्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यत या विभागास, नियोजन विभाग, वित्त विभाग व इतर संबंधित प्रशासकीय विभाग व आदिवासी विकास, आयुक्त यांचे कार्यालय, नाशिक यांना पाठवाव्यात.

५. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची नियंत्रक अधिका-यांनी नोंद घ्यावी.

**६. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.**

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०१००९१४१७०७३९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(सु.द.नाईक)**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
विभागीय आयुक्त,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)**
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर (प्रत्येकी ५ प्रती)
वित्त विभाग/नियोजन विभाग/महिला व बालविकास विभाग (बजेट), मंत्रालय, मुंबई-३२
शालेय शिक्षण विभाग/उच्च व तंत्र शिक्षण विभाग मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी ,(सर्व).
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
संगणक समन्वयक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (का.६),

**आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील जुलै, २०१० च्या अधिवेशनात मंजूर झालेल्या पुरक तरतूदीचे वाटप**

**<u>पुरक मागणी बाब क्रमांक: २२५</u>**

| | |
|---|---|
| **शिर्ष :** सामान्यशिक्षण<br>**योजनेचे नाव :-** सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान<br>**(राज्यस्तर)**<br>**(रुपये हजारात)** | **मागणी क्रमांक :-** टी-५<br>**मुख्य लेखाशिर्ष :-** २२०२- सर्वसाधारण शिक्षण- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२-माध्यमिक शिक्षण-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान<br>**(२२०२ १९०१)** ३५, सहाय्यक अनुदाने (वेतन) |

| **जिल्हयाचे नाव** | **२०१०-११ साठी केलेली पुरक तरतुद** | **२०१०-११ ची पूरक तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| एकुण | १४०८८ | सचिव<br>शालेय शिक्षण विभाग<br>मंत्रालय, मुंबई | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,मंत्रालय, मुंबई. | |

**आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील जुलै, २०१० च्या अधिवेशनात मंजूर झालेल्या पुरक तरतूदीचे वाटप**

**<u>पुरक मागणी बाब क्रमांक: २२६</u>**

| | |
|---|---|
| **शिर्ष :**-तंत्रशिक्षण<br>**योजनेचे नाव :-** माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षापूर्व व्यवसाय शिक्षणाचा विकास (माध्यमिक स्तरीय व्यावसायिकीकरण).<br>**(रुपये हजारात)**<br>**(राज्यस्तरीय)** | **मागणी क्रमांक :-** टी-५<br>**मुख्य लेखाशिर्ष :-** २२०३-तंत्रशिक्षण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षापूर्व व्यवसाय शिक्षणाचा विकास (माध्यमिक स्तरीय व्यावसायिकीकरण). (जिल्हा)<br>**(२२०३ ०७३९)** ०१-वेतने, ०६-दूरध्वनी वीज व पाणी शुल्क, ११-देशांतर्गत प्रवास खर्च, १३-कार्यालयीन खर्च, २१-सामग्री व पुरवठा, १४- भाडेपट्टी व कर |

| **जिल्हयाचे नाव** | **२०१०-११ साठी केलेली पुरक तरतुद** | **२०१०-११ ची पुरक तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| एकुण | ११६५ | मा.प्रधान सचिव<br>उच्च तंत्र शिक्षण<br>विभाग,मंत्रालय, मुंबई. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई. | |

**आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील जुलै, २०१० च्या अधिवेशनात मंजूर झालेल्या पुरक तरतूदीचे वाटप**

**पुरक मागणी बाब क्रमांक: २२७**

| | |
|---|---|
| **शिर्ष : मागासवर्गीयांचे कल्याण**<br>**योजनेचे नांव :** अनुसूचित जमातींच्य विद्यार्थ्यांना नामांकीत इंग्रजी माध्यमाच्या निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे.<br>**(राज्यस्तर योजना)**<br>**(रुपये हजारात)** | **मागणी क्रमांक टी-५**<br>**मुख्य लेखाशिर्ष :** २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२, अनुसूचित जमातीचे कल्यण-७९६-जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०२) (२९) अनुसूचित जमातींच्य विद्यार्थ्यांना नामांकीत इंग्रजी माध्यमाच्या निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे.<br>**(२२२५ सी ९९९)** ३१ सहाय्यक अनुदाने-(वेतनेतर) |

| **जिल्हयाचे नाव** | **२०१०-११ साठी केलेली पुरक तरतूद** | **२०१०-११ ची पुरक तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **एकूण-** | **१२५०००** | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक. | आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | |

**टीप :** आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी वरील तरतूदीचे वाटप संबंधितांना करावे व तसे शासनास कळवावे.

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील जुलै, २०१० च्या अधिवेशनात मंजूर झालेल्या पुरक तरतूदीचे वाटप

**पुरक मागणी बाब क्रमांक: २२८**

| | |
|---|---|
| **शिर्ष :-** महिला व बाल विकास<br>**योजनेचे नाव :-** जिल्हा परिषदांना अंगणवाडी इमारतीच्या बांधकामासाठी अनुदाने<br>(रुपये हजारात )<br>**(राज्यस्तरीय)** | **मागणी क्रमांक :-** टी-५<br>**मुख्य लेखाशिर्ष :- २२३६**-पोषण आहार-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२-पोषक अन्न व व पेये वितरण- ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२२३६ १४१७) जिल्हा परिषदांना अंगणवाडी इमारतीच्या बांधकामासाठी अनुदाने<br>३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) |

| जिल्हयाचे नाव | २०१०-११ साठी केलेली पुरक तरतुद | २०१०-११ ची पुरक तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| एकूण | २५०००० | सचिव, महिला व बालविकास विभाग,मंत्रालय, मुंबइ | महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई | तरतूद वितरीत करण्यापुर्वी जिल्हानिहाय प्रस्तावास आदिवासी विकास विभागाची मान्यता घेण्यांत यावी. |

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील जुलै, २०१० च्या अधिवेशनात मंजूर झालेल्या पुरक तरतूदीचे वाटप

**पुरक मागणी बाब क्रमांक: २२९**

| | |
|---|---|
| **शिर्ष :-**तंत्रशिक्षण<br>**योजनेचे नाव :-** माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षापूर्व व्यवसाय शिक्षणाचा विस्तार<br>**(राज्यस्तरीय)**<br>**(रुपये हजारात)** | **मागणी क्रमांक :-** टी-६<br>**मुख्य लेखाशिर्ष :-** ४२०२-तंत्रशिक्षण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ०२-तंत्रशिक्षण,७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षापूर्व व्यवसाय शिक्षणाचा विस्तार (जिल्हा)<br>**(४२०२ ०७५८)** ५३, मोठी बांधकामे |

| जिल्ह्याचे नाव | २०१०-११ साठी केलेली पुरक तरतुद | २०१०-११ ची पूरक तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| एकुण | १८३५ | मा.प्रधान सचिव उच्च तंत्र शिक्षण विभाग मंत्रालय, मुंबई | उच्च व तंत्रशिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई. | |